सर्व अकृषी विद्यापीठांमध्ये क्रेडीट सिस्टीम
पध्दती अमलात आणण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
परिपत्रक क्र. संकीर्ण २०१०/प्रक्र. ४६ /विशि-३
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १७ ऑक्टोबर, २०११.

**प्रस्तावना : -** विद्यापीठ अनुदान आयोगाने सर्व विद्यापीठांनी क्रेडीट सिस्टिम पध्दती राबवावी असे निर्देश यापूर्वीच सर्व विद्यापीठांना दिले आहेत. त्याचप्रमाणे सर्व विद्यापीठांच्या कुलगुरुंच्या संयुक्त परिषदेमध्ये (जे.बी.व्ही.सी) याबाबत चर्चा होऊनही सर्व विद्यापीठांनी क्रेडीट सिस्टिम पध्दती पूर्णपणे अमलात आणलेली नाही. या संदर्भात दिनांक २३ फेब्रुवारी, २०१० रोजी मा. मंत्री (उ. व तं.शि.) यांच्या अध्यक्षते खाली क्रेडीट सिस्टिम पध्दती अमलात आणण्याबाबत बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीत ही पध्दती सर्व विद्यापीठांनी एकरुप स्वरुपात (Uniform) एकाच वेळी लागू करावी, त्यासाठी वेळापत्रक आखण्यात यावे, तसेच आवश्यक ती यंत्रणा उभी करुन सर्व विद्यापीठांनी याबाबत कार्यदिशा ठरवावी व त्यासाठी विद्यापीठांनी एकत्रिपणे विचार विनिमय करावा असे निर्णय घेण्यात आले आहेत. त्यानुसार विद्यापीठांमध्ये सदर पध्दती अमलात आणण्याबाबत प्रक्रिया सुरु झाली असली तरी क्रेडीट सिस्टिम पध्दती सर्व विद्यापीठांमध्ये पूर्णपणे राबविण्यात आलेली नाही.

**परिपत्रक :-** वरील सर्व बाबी विचारात घेऊन राज्यातील सर्व अकृषी विद्यापीठांनी क्रेडीट सिस्टिम लागू करण्याबाबत खालीलप्रमाणे कार्यवाही करावी.

१. ज्या विद्यापीठांनी क्रेडीट सिस्टिम पध्दती अद्याप अमलात आणलेली नाही त्या विद्यापीठांनी चालू शैक्षणिक वर्षापासून क्रेडीट सिस्टिम अमलात आणण्याच्या दृष्टीने तात्काळ कार्यवाही सुरु करावी.

२. ज्या विद्यापीठांना चालू शैक्षणिक वर्षात क्रेडीट सिस्टिम पध्दती अमलात आणणे शक्य होणार नाही त्या विद्यापीठांनी सन २०१२-१३ या शैक्षणिक वर्षापासून सदर पध्दती अमलात आणण्या संदर्भात कार्यवाही सुरु करावी.

३. ज्या विद्यापीठांनी क्रेडीट सिस्टिम पध्दती अद्याप अमलात आणलेली नाही तसेच ज्या विद्यापीठांना चालू शैक्षणिक वर्षात क्रेडीट सिस्टिम पध्दती अमलात आणणे शक्य होणार नाही त्या विद्यापीठांनी सन २०१२-१३ या शैक्षणिक वर्षापासून सदर पध्दती अमलात आणण्या संदर्भात कालबध्द कार्यक्रम आखून सन २०१२-१३ या शैक्षणिक वर्षापासून सदर पध्दती निश्चीतपणे अमलात आणण्या संदर्भात कार्यवाही सुरु करावी.आवश्यकता भासल्यास त्यासाठी आवश्यक ती यंत्रणा उभारावी.

हे परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१११०१७१३३४२३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

( प्र. गि. कानडे )
कार्यासन अधिकारी

प्रति,

कुलगुरु, सर्व अकृषी विद्यापीठे,

कुलसचिव , सर्व अकृषी विद्यापीठे,

मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई- ४०० ०३५

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

सर्व विभागीय सह संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य,

मा. मंत्री (उ. व तं. शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

मा. राज्य मंत्री (उ. व तं. शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.

सर्व सह सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.

उप सचिव (विशि) , उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.

निवड नस्ती (विशि-३)